**खाजगी उपसा सिंचन योजनांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. संकीर्ण २०१५/१४५/१५/सिं.व्य.(धो)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २१/०२/२०१९

**वाचा:**

१. शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१५/१४५/१५/सिं.व्य.(धो),दिनांक २२/०२/२०१६
२. शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१५/१४५/१५/सिं.व्य.(धो),दिनांक ०७/११/२०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ दिनांक ८/६/२००५ पासून अंमलात आला आहे.

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम १२ (६) (घ) मध्ये खालीलप्रमाणे तरतूद आहे.

"अस्तित्वात असलेल्या खाजगी उपसा सिंचनाचे व्यवस्थापन, पाण्याचा कार्यक्षम वापर करण्याच्या अटीवर, पाच वर्षे चालू ठेवण्यात येईल. त्यानंतर शासन विनिर्दिष्ट करील अशा दिनांकापासून कलम १४ (४) मधील तरतूदी लागू होतील.परंतु असे की, वेगवेगळया क्षेत्राकरिता भौगोलिक परिस्थितीनुसार वेगवेगळे दिनांक अधिसूचित करता येतील."

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम १४ (४) मध्ये खालीलप्रमाणे तरतूद आहे.

" निर्धारित केला जाईल अशा भागातील बारमाही पिकांना निर्धारित केला जाईल अशा दिनांकापासून, ठिंबक सिंचन, तुषार सिंचन अथवा प्राधिकरणाने मान्यता दिलेले अन्य पाण्याची बचत करणारे तंत्र वापरल्याखेरीज कालव्यामधून पाणी दिले जाणार नाही. या बचतीमधून भविष्यातील वाढीव पिण्याच्या पाण्याची मागणी भागवून शिल्लक राहिलेले पाणी लाभक्षेत्रातील तसेच लगतच्या भागात समन्यायी तत्वावर वाटप करण्यात येईल."

राज्यात बऱ्याच खाजगी उपसा सिंचन योजनांना, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ अंमलात येण्यापूर्वी पाणी परवानगी देण्यात आली आहे. त्यामुळे महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम १२ (६) (घ) नुसार, खाजगी उपसा सिंचन योजना सुरु ठेवण्याची मुदत दिनांक ७/६/२०१५ रोजी जरी संपली असून त्यास संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०७/०६/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. जरी सदर मुदतवाढ संपली असली तरी, राज्यात फार मोठया प्रमाणावर खाजगी उपसा सिंचन योजना कार्यान्वित आहेत, असे निदर्शनास आले आहे. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांच्या दि. २५ जून,२०१५ च्या अधिसूचनेनुसार राज्यातील १)टेंभु उपसा सिंचन योजना(सांगली) २) भीमा (उजनी) ३) मुळा (अहमदनगर) ४) निम्न मानार (नांदेड) ५) हतनूर ६) ऊर्ध्व पूस (यवतमाळ) ७) कान्होली नाला (नागपूर)

८) अंबोली (सिंधुदुर्ग) या ८ प्रकल्पांवर ठिबक व तुषार सिंचन प्रणाली वापरणे बंधनकारक केले आहे. या ८ योजना वगळता राज्यातील प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत व जलाशयावरील खाजगी उपसा सिंचन योजनांना, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम १४ (४) मधील तरतूद लागू करण्यासाठी दिनांक विनिर्दिष्ट करण्याचा, अथवा खाजगी उपसा सिंचन योजनांना दिनांक ०७/०६/२०१८ नंतरच्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** -

शासनाने प्रस्तुत प्रस्तावाबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम १२ (६) (घ) मधील तरतुदीनुसार, शेतकऱ्यांच्या हितासाठी, राज्यातील १) टेंभु उपसा सिंचन योजना (सांगली) २) भीमा (उजनी) ३) मुळा (अहमदनगर) ४) निम्न मानार (नांदेड) ५) हतनूर ६) ऊर्ध्व पूस (यवतमाळ) ७) कान्होली नाला (नागपूर) ८) अंबोली (सिंधुदुर्ग) हे प्रकल्प वगळता इतर सर्व पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रातील व जलाशयावरील खाजगी उपसा सिंचन योजनांना, दिनांक ०७ जुन,२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (मजनिप्रा) अधिनियम २००५ च्या कलम १२( ६) (घ) मध्ये नमुद केल्यानुसार, पाण्याचा कार्यक्षम वापर करण्याच्या अटीवर वरीलप्रमाणे ८ प्रकल्पांच्या लाभक्षेत्रातील व जलाशयावरील अस्तित्वात असलेल्या खाजगी योजना वगळता उर्वरित सर्व प्रकल्पांच्या लाभक्षेत्रातील व जलाशयावरील दिनांक ०७/०६/२०१८ रोजी अस्तित्वात असलेल्या व नव्याने प्रस्तावित असलेल्या सर्व खाजगी उपसा सिंचन योजनांना ही मुदतवाढ लागू राहिल. नव्याने प्राप्त होणाऱ्या खाजगी उपसा सिंचन योजनांच्या प्रस्तावांतील बारमाही पिकांना ठिबक सिंचन, तुषार सिंचन अथवा महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाने मान्यता दिलेले अन्य पाण्याच्या बचत करणारे तंत्र वापरणे बंधनकारक राहिल, या अटीच्या अधीन राहून सदर प्रस्तावांना मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२११२००१९५३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2019.02.21 12:02:45 +05'30'

**(अ.अ. कपोले)**

**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.

३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव.
४. उर्वरित सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) -१ , महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२ महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) -२ , महाराष्ट्र, नागपूर
१०.सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
११.मुख्य सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१२.सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग,
२१.सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग,
२२.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
२३.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
२४.निवडनस्ती कार्यासन सिंव्य धोरण.